**आदिवासी क्षेत्र उपयोजना/ आदिवासी क्षेत्राबाहेरील उपयोजना मार्च,२०१० च्या अधिवेशनात अर्थसंकल्पीत करण्यात आलेल्या "नगर विकास" या उपशिर्षाखालील योजनांतर्गत राज्यस्तरीय तरतूदीचे वाटप.**

**महाराष्ट्र शासन**
**आदिवासी विकास विभाग**
**शासन निर्णय क्र.बीयुडी-२००९/प्र.क्र.७/का.६**
**मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२.**
**दिनांक :- २४ मार्च, २०११**

**वाचा :** १) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र.अंदाज-२०.१०/सीआर ६५/२०१०/अर्थसंकल्प-३, दिनांक ३ एप्रिल, २०१०
२) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र.अंदाज-२०१०/प्र.क्र. ७१/२०१०/अर्थसकल्प-३,दिनांक १८ मे, २०१०
३) शासन निर्णय क्र.नावयो-२०१०/प्र.क्र.२२०/का.१२, दिनांक ९.२.२०११.

**शासन निर्णय :-** आदिवासी उपयोजनेंतर्गत "नगर विकास" या उपशिर्षाखाली सन २०१०-११ या चालू आर्थिक वर्षाच्या कालावधीसाठी अर्थसंकल्पीय अंदाजात समाविष्ट करण्यात आलेल्या तरतुदीचे योजनांनिहाय वाटप आणि प्रत्येक योजनांचे नियंत्रक अधिकारी सोबत जोडलेल्या विवरणपत्रात दर्शविले आहेत. सोबतच्या विवरणपत्रातील स्तंभ-२ मध्ये दर्शविलेल्या योजनांच्या तरतूदी स्तंभ-३ मध्ये दर्शविलेल्या नियंत्रक अधिकाऱ्यांकडे सुर्पूद करण्यात येत असून सदर तरतूद खर्च करण्यास मंजूरी देत आहे. त्यांनी या तरतूदी कॅश फ्लो प्रमाणे खर्च कराव्यात.

२. नियंत्रक अधिकारी आणि विभागप्रमुख यांनी ही तरतुद शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग क्र.टिएसपी-१०८६/८७१०/प्र.क्र.३१/का.५ दिनांक ९.३.१९९० अन्वये निश्चित केलेल्या आदिवासी उपयोजना क्षेत्रातील व क्षेत्राबाहेरील मान्य कार्यक्रमांवर/योजनांवर खर्च होतील याची दक्षता घ्यावी. तसेच या तरतूदी खर्च करतांना शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग, क्र.टिएसपी-२००३/प्र.क्र.१०१/का-६, दिनांक २६ जुलै, २००४ व टिएसपी-२००५/प्र.क्र.५९/का-६, दिनांक १० नोव्हेंबर, २००५ मधील अटींचे कटाक्षाने पालन करण्याची दक्षता घेण्यात यावी तसेच प्रस्तुत शासन निर्णयाद्वारे वितरित करण्यात येत असलेल्या तरतूदी मासिक खर्च विवरणपत्राप्रमाणे खर्च करण्याची दक्षता सर्व नियंत्रक अधिका-यांनी घ्यावी. सदर तरतूदी संगणक वितरण प्रणालीवर उपलब्ध करुन देण्यात येत आहेत.

३. नियंत्रक अधिकारी व विभाग प्रमुख यांनी आदिवासी उपयोजना क्षेत्रात अतिरिक्त आदिवासी उपयोजना क्षेत्रात तसेच आदिवासी उपयोजने क्षेत्राबाहेरील योजनांवर केलेला खर्च स्वतंत्रपणे नोंदविला जाईल याची दक्षता घ्यावी. जेणेकरुन शासनाला आदिवासी क्षेत्रातील व उपयोजने क्षेत्राबाहेरील योजनांवर होणा-या खर्चावर लक्ष ठेवता येईल व तो केंद्रशासनाला कळविता येईल.

४. सर्व नियंत्रक अधिका-यांनी योजनावार मासिक खर्चाची विवरणे आदिवासी क्षेत्र व अतिरिक्त आदिवासी उपयोजना क्षेत्रासाठी व आदिवासी उपयोजना क्षेत्राबाहेरील क्षेत्रासाठी स्वतंत्रपणे विहीत प्रपत्रात ज्या महिन्यात खर्च झाला असेल त्याच्या पुढील महिन्याच्या १० तारखेपर्यत या विभागास, नियोजन विभाग, वित्त विभाग व इतर संबंधित प्रशासकीय विभाग व आदिवासी विकास, आयुक्त यांचे कार्यालय, नाशिक यांना पाठवाव्यात.

५. नियंत्रक अधिकारी/विभाग प्रमुख यांनी नियम प्रचलित कार्यपध्दती व सध्याच्या शासकीय धोरणास अनुसरुन चालू योजनांवर खर्च करावा. हे आदेश फक्त नियंत्रक अधिका-यांच्या अधिनस्त ठेवलेल्या तरतुदीस प्रशासकीय दृष्टया मान्य केलेल्या चालू योजनांवर खर्च करण्यासाठी आहे. याची नियंत्रक अधिका-यांनी नोंद घ्यावी.

**६. आदिवासी उपयोजनेअंतर्गत आदिवासी क्षेत्र उपयोजना (टिएसपी) व आदिवासी क्षेत्राबाहेरील उपयोजना (ओटिएसपी) यांचा खर्च स्वतंत्रपणे नोंदविण्यासाठी लेखाशिर्षामध्ये काही बदल करण्यात आले असल्यास हे बदल लक्षात घेवून खर्च नोंदविताना सुधारित लेखाशिर्ष नोंदविण्याची दक्षता सर्व संबंधितांनी घ्यावी.**

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करुन देण्यात आला असून, त्याचा **संगणक सांकेतांक २०११०३२४१०२४३४००१** असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

**( श. र. सावंत )**
**कार्यासन अधिकारी**

**प्रति,**

आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक.
अपर आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक
विभागीय आयुक्त, नाशिक
जिल्हाधिकारी, नाशिक
प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, नाशिक/कळवण
जिल्हा कोषागार अधिकारी, नाशिक
मुख्य अधिकारी, नगरपरिषद, त्र्यंबक
महालेखापाल (लेखापरिक्षा)/(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.(प्रत्येकी २ प्रती)
वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
नियोजन विभाग,मंत्रालय,मुंबई
कार्यासन अधिकारी का.क्र. २, १२ आदिवासी विकास विभाग, मंत्रालय,मुंबई.
संचालक, नगर रचना, पुणे (बजेट ३ प्रती )
निवड नस्ती (का-६)

## आदिवासी क्षेत्र उपयोजनेखालील २०१०-११ चे अंदाजपत्रकीय तरतूदीचे वाटप
## (टि.एस.पी.)

<table>
<tr><td colspan="2">शिर्ष :- नगर विकास<br>योजनेचे नांव :- नागरी आदिवासी वस्ती सुधारणा<br>(राज्यस्तर योजना)<br>(रु.हजारात)</td><td colspan="3">मागणी क्रमांक :- टी - ५<br>मुख्य लेखाशिर्ष :- २२१७-नगर विकास-पंचवार्षिक योजनांतर्गत योजना-८०- सर्वसाधारण-७९६-जनजाती क्षेत्र उपयोजना (०१) जनजाती क्षेत्र उपयोजनांतर्गत योजना-राज्य योजनांतर्गत योजना<br>(०१) (०२) नागरी आदिवासी वस्ती सुधारणा<br>(२२१७ १२५९) ३१, सहाय्यक अनुदाने (वेतनेतर)</td></tr>
<tr><td>जिल्हयाचे नांव</td><td>२०१०-११ साठी केलेली पूरक तरतूद</td><td>२०१०-११ ची अर्थसंकल्पीय तरतूद सुर्पूद करण्यात आलेला नियंत्रक अधिकारी</td><td>प्रशासकीय विभाग</td><td>शेरा</td></tr>
<tr><td>१</td><td>२</td><td>३</td><td>४</td><td>५</td></tr>
<tr><td>एकुण</td><td>२५४६</td><td>प्रधान सचिव,<br>नगर विकास विभाग,<br>मंत्रालय, मुंबई-३२.</td><td>नगर विकास विभाग,<br>मंत्रालय, मुंबई</td><td></td></tr>
</table>